**वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण (योजनेत्तर) या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेली १४२ अस्थायी पदे सन २०१९-२० मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी ०३.१९/प्र.क्र. १०४/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ ऑक्टोंबर, २०१९.

**वाचावे :-**

१. महसूल व वनविभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.१८/प्र.क्र.११५/फ-१ दिनांक २७.०३.२०१८.
२. महसूल व वनविभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.१८/प्र.क्र.११५/फ-१ दिनांक ०३.१०.२०१८.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक २१.०२.२०१९.
४. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र कक्ष-३/योजनेतर/ प्र.क्र. ०३/१८-१९/२०९१, दिनांक २१.०२.२०१९.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक: डब्ल्युएलपी ०३.१८/प्र.क्र.१०४/फ-१ दिनांक १५.०३.२०१९.
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक ११.०९.२०१९.
७. महसूल व वनविभाग, शासन निर्णय क्रमांक : एमएफएस. २०१७/ प्र.क्र. ७७/ फ-८, दिनांक १३.०९.२०१९.

**प्रस्तावना:-**

वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण (योजनेत्तर) या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १४२ अस्थायी पदांना सन २०१८-२०१९ मध्ये संदर्भ क्रमांक १ व २ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे.

२. मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण (योजनेत्तर) या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १४२ अस्थायी पदांना सन २०१९-२० मध्ये दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला होता.

३. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक ३०.०९.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले होते त्यानुसार वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण (योजनेत्तर) या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १४२ अस्थायी पदांना सन २०१९-२० मध्ये दिनांक ०१.०३.२०१९ ते दिनांक ३०.०९.२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली होती.

४. आता प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

I. संदर्भ क्रमांक ७ च्या शासन निर्णयान्वये वन विभागाचा निश्चित करण्यात आलेल्या आकृतीबांधात वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण (योजनेत्तर) या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १४२ अस्थायी पदांचा समावेश असल्यास सदर १४२ पदांना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ६ च्या शासन निर्णयाच्या अधिन राहून सन २०१९-२० मध्ये दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

II. वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण (योजनेत्तर) या योजनेअंतर्गत निर्माण करण्यात आलेल्या १४२ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६- वनीकरण व वन्य जीवन (योजनेतर), ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवन संरक्षण (००) (००) (०१) निसर्ग संवर्धन व वन्य पशु संरक्षण (२४०६ ०७६६) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

III. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : असंक-१००४/प्र.क्र.१२ /(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/विसु-१, दिनांक ११.०२.२०१६, क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक २१.०९.२०१६, क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दिनांक २१.०२.२०१९ व क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दिनांक ११.०९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१६१२०६३१०९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL DESHBHRATAR

Digitally signed by SWAPNIL DESHBHRATAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, postalCode=400037, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=ce420aedd83773a67f861ab4c751835b3c5119f8fc41f2f3aa39bd7749dc02e0, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL DESHBHRATAR
Date: 2019.10.16 12:08:22 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
६. मुख्य वनसंरक्षक, प्रादेशिक (सर्व). / वनसंरक्षक, प्रादेशिक (सर्व).
७. उपवनसंरक्षक,यावल/जळगांव/अकोट/धारणी/नांदेड/पुसद/पुणे/सावंतवाडी/औरंगाबाद/ नागपूर/वर्धा/अहमदनगर/अलीबाग/कोल्हापूर/ताडोबा राष्ट्रीय उद्यान, चंद्रपूर.
८. उप विभागीय वन अधिकारी, भोर/सांगली.
९. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), म.रा.मुंबई/नागपूर.
१०. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

*******

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०३.१९/प्र.क्र. १०४/फ-१, दिनांक १६ ऑक्टोंबर, २०१९ सोबतचे विवरणपत्र**

(दिनांक ०१.१०.२०१९ ते दिनांक २९.०२.२०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आलेली पदे)

| अ.क्र | पद | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) | १ |
| २ | वनसंरक्षक | १ |
| ३ | वनपाल | २० |
| ४ | वनरक्षक | ७४ |
| ५ | शिपाई | ५ |
| ६ | चौकिदार | १ |
| ७ | खानसामा नि चौकिदार | २ |
| ८ | सफाई कामगार | १ |
| ९ | माळी | १७ |
| १० | हत्यारी पोलीस शिपाई | २ |
| ११ | वाहन चालक | ९ |
| १२ | स्वच्छक | १ |
| १३ | पहारेकरी | ७ |
| १४ | वनपाल (गाईड) | १ |
| | एकूण | १४२ |

**********